# महाराष्ट्र विधानपरिषद

## तिसरे (हिवाळी) अधिवेशन, २०१८

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

### प्रश्नांची एकूण संख्या - ५०

---

### नांदेड जिल्हयात पाणलोट मनरेगांतर्गत शेततळ्यांचे कामांचे रेकॉर्ड गहाळ झाल्याबाबत

**(१) १९४७४ (२०-०८-२०१६). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नांदेड जिल्हयातील पाणलोट मनरेगांतर्गत झालेल्या शेततळ्यांच्या कामाची चार पथक चौकशी करताना समितीने अनेक देयके ताब्यात घेण्याचे ठरविले असता अनेक कामांचे रेकॉर्ड गहाळ झाल्याचे चौकशीत आढळून आले, हे ही खरे आहे काय,

(२) मौजे सलगरा बु. हतराळ, सावळी, कलंबर आदी विटाकणच्या कामाची चौकशी केली असता एम.बी. (मोजमाप बुक) मध्ये खर्च केल्याची नोंद घेण्यात आली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) तसेच नांदेड जिल्हयात पाणलोट, जलयुक्त शिवाराची कामे करणारे कंत्राटदार लातूर, उस्मानाबाद, परभणी आदी जिल्हयात पाणलोट, जलयुक्त शिवारांची कामे करीत असल्याबाबत एका अधिकाऱ्याने निदर्शनास आणले आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (२८-०६-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.
(३) हे खरे नाही.
(४) सदर प्रकरणी प्राथमिक चौकशी करण्यात आली असून दोषी आढळून आलेले अधिकारी तालुका कृषी अधिकारी-१, मंडळ कृषी अधिकारी-२ यांचेविरुध्द कृषी आयुक्तालय यांचेकडे प्रशासकीय कार्यवाहीचा प्रस्ताव सादर केला असून दोषी कर्मचारी कृषी पर्यवेक्षक-३, कृषी साहाय्यक-६ यांना निलंबित केलेले आहे.

---

## अंतरगाव (ता.भूम, जि.उस्मानाबाद) येथील शेतकऱ्यांने कर्ज फेडण्यासाठी मूत्रपिंड विकण्याबाबत

**(२) २६८३४ (१२-०४-२०१७). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.अनिल भोसले, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अंतरगाव (ता.भूम, जि.उस्मानाबाद) येथील श्री.अरुण गोरे या शेतकऱ्यांने कर्ज फेडण्यासाठी मूत्रपिंड विकण्याची परवानगी मिळणेबाबत जिल्हाधिकारी, उस्मानाबाद यांचेकडे अर्ज केला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त शेतकऱ्याचे कर्ज तसेच राज्यातील दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांची पूर्ण कर्जमाफी करण्यासाठी शासनाने कोणता धोरणात्मक निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (११-०६-२०१८) :** (१) होय.
(२) उक्त शेतकऱ्याकडे कोणत्याही प्रकारचे कर्ज नाही.

सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाचा शासन निर्णय दिनांक २८/०६/२०१७ अन्वये राज्यातील शेतकऱ्यांसाठी छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना-२०१७ नुसार कर्जमाफी व कर्ज सवलत योजना राबविण्याचा निर्णय घेण्यात आला.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## गौडगाव (ता.अक्कलकोट, जि.सोलापूर) येथील जिल्हा परिषद शाळेची दूरवस्था दूर करण्याबाबत

**(३) २९७०३ (१५-०४-२०१७). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गौडगाव (ता.अक्कलकोट, जि.सोलापूर) येथील जिल्हा परिषदे शाळेची दूरवस्था झाल्यामुळे सुमारे ४०० विद्यार्थ्यांचे आरोग्य धोक्यात आल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यासंदर्भात तक्रार करुनही सदर परिसर स्वच्छ होत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन स्वच्छता अभियानांतर्गत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०३-०७-२०१८) :** (१) होय, हे अंशतः खरे आहे.

कारण जनावरे / ग्रामस्थांची रहदारी होती. तथापि, विद्यार्थ्यांचे आरोग्य धोक्यात नव्हते.

(२) नाही. हे खरे नाही.

(३) व (४) स्वच्छ विद्यालय पुरस्कार अंतर्गत शाळेचा परिसर स्वच्छ करण्यात आलेला आहे. सदर शाळेला स्वच्छतेच्यादृष्टीने संरक्षण भिंत बांधण्यात आली आहे.

---

## महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण हमी योजनेंतर्गत केंद्रीय संयुक्त सचिवांनी सादर केलेल्या पाहणी अहवालाबाबत

**(४) ३०५१२ (१५-०४-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण हमी योजनेंतर्गत केंद्रीय संयुक्त सचिवांनी सादर केलेल्या पाहणी अहवालात सन २०१४-१५ व त्यापुर्वी सुरू करण्यात आलेल्या १४५४९९ कामांपैकी अनेक कामे अपूर्ण असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर पाहणी अहवालात प्रलंबित विकास कामे प्रगतीपथावर असल्याचे दाखवून सदर कामे माहे डिसेंबर, २०१६ अखेरपर्यंत पूर्ण करण्याचे आश्वासन दिले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर कामाबाबत केंद्रीय संयुक्त सचिव यांनी व केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालयाच्या उच्चपथस्थ अधिकाऱ्याने याबाबत शासनाच्या एकूण कार्यक्षमतेबाबत अनेक विकास कामाच्या गतिशीलता खुंटल्याबाबत शासनाला जबाबदार धरले आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, राज्याला मनरेगातून शौचालयाच्या कामासाठी एकूण जॉब कार्ड उदिष्टांपैकी कमी जॉब कार्ड प्रमाणित करण्यात आली आहेत,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (२८-०६-२०१८) :** (१) हे खरे नाही.

केंद्र सरकारच्या संयुक्त सचिव समितीचा दिनांक ४/१/२०१७ रोजीचा प्रस्तावित दौरा महत्वाच्या कामामुळे ऐनवेळी रद्द करण्यात आल्यामुळे झालेला नाही.

(२) व (३) हे खरे नाही.

तथापि, वित्तीय वर्ष २०१६-१७ व त्या आधी सुरु करण्यात आलेली कामे दिनांक ३० जून, २०१८ पर्यंत तसेच वित्तीय वर्ष २०१७-१८ दरम्यान सुरु करण्यात आलेली व सद्य:स्थितीत अपूर्ण असलेली कामे दिनांक ३० सप्टेंबर, २०१८ पर्यंत पूर्ण करण्याच्या सूचना केंद्र शासनाकडून देण्यात आलेल्या आहेत.

(४) हे खरे नाही.

जॉब कार्डचे लक्षांक निश्चित करुन देण्यात येत नाहीत.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात मुलींच्या जन्मदरात घट झाल्याबाबत

**(५) ३२५७८ (१८-०८-२०१७). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सन २०१६ मध्ये हजार मुलांमागे मुलींचा जन्मदर ८९९ वर पोहोचल्याने मुलींच्या जन्मदरात घट झाल्याची माहिती आरोग्य विभागाकडून जारी करण्यात आलेल्या अहवालातून माहे एप्रिल, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यानुषंगाने राज्यात मुलींच्या जन्मदरात प्रगती होण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०१-०८-२०१८) :** (१) हे अंशतः खरे आहे,

सन २०१६ मध्ये जन्माच्या वेळी १००० मुलांच्या मागे ९०४ मुलींचे जन्म एवढे प्रमाण आहे.

(२) राज्यात लिग निदान करुन होणारे गर्भपात रोखण्यासाठी व मुलींच्या जन्माचे महत्व पटवून देण्यासाठी टि.व्ही., रेडीओ जिंगल ऑडीओव्दारे जनजागृती करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे लिंगगुणोत्तर प्रमाण हा विषय जिल्हा नियोजन समितीच्या बैठकीत चर्चेसाठी घेण्याबाबत सर्व जिल्हाधिकारी यांना आयुक्तांमार्फत पत्र पाठविण्यात आले आहे.

तसेच गर्भपात रोखण्यासाठी शासकीय संकेतस्थळ व हेल्पलाईन सुरु करण्यात आली आहे. अवैध गर्भपात करणाऱ्या केंद्राची माहिती देणाऱ्यास बक्षीस दिले जाते. तसेच समुचित प्राधिकारी, यांचेमार्फत सोनोग्राफी केंद्रांची

त्रैमासिक तपासणी केली जाते. पीसीपीएनडीटी कायद्याचा भंग करणाऱ्याविरुध्द नियमानुसार कारवाई केली जाते.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बीड येथील महावितरण कंपनीच्या ट्रान्सफार्मर दुरूस्तीबाबत

**(६) ३३९९२ (१८-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बीड जिल्हा महावितरण कंपनीकडे १०० के.व्ही.ए. व ६० के.व्ही.ए.चे एकूण किती ट्रान्सफार्मर उपलब्ध तथा कार्यरत आहेत,
(२) असल्यास, माहे जानेवारी, २०१६ ते दिनांक ३० जून, २०१७ या कालावधीत किती १०० के.व्ही.ए. व ६० के.व्ही.ए. ट्रान्सफारर्मरची दुरूस्ती करण्यात आली आहे,
(३) असल्यास, उक्त कालावधीत ट्रान्सफार्मरच्या दुरूस्तीवर किती खर्च करण्यात आला व सदरहू ट्रान्सफार्मर कोणकोणत्या कंपनीकडून दुरूस्त करून घेतले आहेत,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२०-०८-२०१८) :** (१) महावितरण कंपनीच्या बीड मंडळांतर्गत १०० के.व्ही.ए. क्षमतेची ६५२६ वितरण रोहीत्रे कार्यरत आहेत व ६३ के.व्ही.ए. क्षमतेची ८०२६ वितरण रोहीत्रे कार्यरत आहेत
(२) माहे जानेवारी २०१६ ते दिनांक ३० जून, २०१७ अखेर १०० के.व्ही.ए. क्षमतेची एकूण १४११ व ६३ के.व्ही.ए. क्षमतेची एकूण १६४४ वितरण रोहीत्रे दुरुस्त करण्यात आली आहेत.
(३) उक्त कालावधीत १०० के.व्ही.ए. क्षमतेची एकूण १४११ नादुरुस्त वितरण रोहीत्रे दुरुस्त करणेसाठी रुपये २८०.७० लक्ष व ६३ के.व्ही.ए. क्षमतेची एकूण १६४४ नादुरुस्त वितरण रोहीत्रे दुरुस्त करणेसाठी रुपये २८०.७० लक्ष इतका खर्च करण्यात आला आहे. सदर वितरण रोहित्रे विविध २८ रोहित्र दुरुस्त

करणाऱ्या एजन्सीकडून दुरुस्त करुन घेतले आहेत. त्यांची नावे पुढीलप्रमाणे आहेत :- मे.हायटेक इलेक्ट्रिकल्स, बीड, मे.ओरीयन इंडस्ट्रिज, बीड, मे.वैष्णवी इलेक्ट्रिकल्स, बीड, मे.व्यंकटेश ट्रान्सफॉर्मर, माजलगाव, मे.श्री.साईशक्ती इलेक्ट्रिकल्स, बीड, मे.कांचन पॉवर ट्रान्सफॉर्मर, उस्मानाबाद, मे.बालाजी ट्रान्सफॉर्मर, बीड, मे.साई इंडस्ट्रिज, बीड, मे.पॉवर इंजिनिअरींग, बीड, मे.वैष्णवी इलेक्ट्रिकल्स, लातूर, मे.माऊली इंडस्ट्रिज, लातूर, मे.श्रंगेरी इलेक्ट्रिकल्स, आष्टी, मे.सक्षम इंजिनिअर्स, गेवराई, मे.एन दत्ता इलेक्ट्रिकल्स, लातूर, मे.केनिन ट्रान्सफॉर्मर, लातूर, मे.केनिन ट्रान्सफॉर्मर, लातूर, मे.दिपा इंडस्ट्रिज, माजलगाव, मे.विद्युत पॉवर, उस्मानाबाद, मे. साई ट्रान्सकेअर, उमरगा, मे.जयदत्त ट्रान्सफॉर्मर, वारणी, मे.मनोरमा ट्रान्सफॉर्मर, बार्शी, मे.राज इंडस्ट्रिज, उस्मानाबाद, मे.कृष्णा इंडस्ट्रिज, अंबाजोगाई, मे.धनंजय इले, सोलापूर, मे.तेजस इंडस्ट्रिज, उस्मानाबाद, मे.मेरी माता, सोलापूर, मे.रणजित इले. लातूर, मे.कांचन इंडस्ट्रिज, उस्मानाबाद.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील वीज निर्मिती प्रकल्पग्रस्तांना शासकीय सेवेत समावून घेणेबाबत

**(७) ३४३०८ (१९-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील वीज महानिर्मिती कंपनीने प्रकल्पग्रस्त उमेदवारांना शासकीय सेवेत सामावून घेण्यासाठी दिनांक १८ एप्रिल, २०१७ रोजी परिपत्रक काढून मान्यता दिली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या योजनेंतर्गत किती प्रकल्पग्रस्त उमेदवार शासकीय सेवेत समाविष्ट होण्यास पात्र आहेत तसेच दिनांक ३० जून, २०१७ अखेर किती प्रकल्पग्रस्तांना शासकीय सेवेत सामावून घेण्यात आले आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०१-०८-२०१८) :** (१) महानिर्मिती कंपनीच्या प्रशासकीय परिपत्रक क्र. ३७४, दिनांक १८ एप्रिल, २०१७ अन्वये महानिर्मिती कंपनीच्या विविध विद्युत कैंद्रामुळे बाधित झालेल्या प्रकल्पग्रस्त उमेदवारांना प्रशिक्षणावर सामावून घेण्याकरीता सर्वसमावेशक प्रगत कुशल योजना सुरु करण्यात आली आहे.

(२) महानिर्मिती कंपनीच्या विविध विद्युत कैंद्रामुळे बाधित झालेल्या ८८ प्रकल्पग्रस्त उमेदवारांना (कैंद्रानिहाय स्थिती : चंद्रपूर-४५, कोराडी-१७, खापरखेडा-०८, नाशिक-१०, पारस-०२, परळी-०६) महानिर्मिती कंपनीच्या विविध प्रशिक्षणावर सामावून घेण्यात आले आहे. उर्वरीत प्रकल्पग्रस्तांच्या कागदपत्रांची पडताळणी करुन त्यांना प्रशिक्षणार्थी म्हणून सामावून घेण्याबाबत कार्यवाही सुरु आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात दहावीच्या परिक्षेत नापास विद्यार्थ्यांना प्रोत्साहन देण्याबाबत

**(८) ३४३६५ (१८-०८-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात मागील २ वर्षात दहावीच्या परिक्षेत सुमारे ४ लाख ९८ हजार ६३९ मुले नापास झाल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले असून नापास मुलांमध्ये सर्वाधिक संख्या शहरी भागातील आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शाळांमार्फत मुलांची पुन्हा परीक्षा घेवून त्यांना प्रोत्साहन देण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-०९-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) अनुत्तीर्ण विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होऊ नये, यासाठी जुलै/ऑगस्ट मध्ये फेरपरीक्षा घेण्याचा निर्णय शासनाने सन २०१५ पासून घेतलेला आहे. १

किंवा २ विषयात उत्तीर्ण होऊ न शकलेल्या विद्यार्थ्यांना पुढील वर्गात प्रवेश घेण्याची (ए.टी.के.टी.) सुविधा उपलब्ध करुन दिलेली आहे. तसेच, ३ किंवा त्यापेक्षा अधिक विषयात उत्तीर्ण होऊ न शकणाऱ्या विद्यार्थ्यांना कौशल्य विषयक प्रशिक्षण देण्यासाठी सन २०१६ पासून "कौशल्य सेतू कार्यक्रम" राबविण्यात येत आहे. "कौशल्य सेतू कार्यक्रमाचा" लाभ घेणाऱ्या विद्यार्थ्यांना इ.१० वीची समकक्षता मिळण्यासाठी क्रेडिटस् चा लाभ देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात वन जमिनीवर अतिक्रमण केल्याबाबत

**(९) ३४३६६ (१८-०८-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात वन जमिनीवर केलेले अतिक्रमण सन २००६ पूर्वीचे असेल तर ते नियमित करण्यासाठी दावा दाखल करता येतो, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कोणत्या सालापर्यंत दावा दाखल करता येतो, यावर काही बंधन आहेत काय,

(३) असल्यास, वन जमीनवरील अतिक्रमण नियमित करावे यासाठी आदिवासी विभागाने वांरवार वन विभागाला विनंती करुनही वन विभागाने कोणतीच कार्यवाही केली नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, राज्यात किती टक्के वन जमिनीवर अतिक्रमणे झाली आहेत, याबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१३-०८-२०१८) :** (१) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता) अधिनियम, २००६ चे कलम ४(३) मधील तरतुदीनुसार दिनांक १३/१२/२००५ पूर्वी ज्या अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी दावेदारांनी वन जमिनीवर कब्जा केला असेल

असे दावेदार दावा करु शकतात. यामध्ये कलम २ (ओ) मधील स्पष्टीकरणानुसार इतर पारंपारिक वन निवासीचे बाबतीत तीन पिढ्यांची अट लागू आहे.

(२) अनुसूचित जमाती व इतर पारंपारिक वन निवासी (वन हक्कांची मान्यता) अधिनियम २००६ अंतर्गत केलेले सुधारित नियम, २०१२ मधील ११ (ए) मधील तरतुदी अनुसार ग्रामसभेने ग्रामस्तरीय समितीस दावेदाराचे अर्ज मागविण्यास प्राधिकृत केल्यापासून नियम १३ मध्ये नमूद केलेल्या पुराव्यापैकी कमीत कमी दोन पुराव्यासह अर्ज मागविण्याची मुदत ३ महिन्यांची आत ग्रामसभेला आवश्यक वाटल्यास काही परिस्थितीत पुरेसे कारणे लेखी नमूद करुन ही मुदत आणखी तीन महिन्यांनी वाढविण्याची तरतूद केली आहे.

(३) आदिवासी विकास विभाग या कायद्याचे अंमलबजावणीसाठी नोडल विभाग आहे व दाव्याची पडताळणीची प्रक्रिया ग्रामविकासस्तरीय समिती, उप विभागीयस्तरीय समिती व जिल्हास्तरीय समिती यांच्याकडून केली जाते. ज्या ज्या वेळी पडताळणीची आवश्यकता आहे, त्या त्या वेळी वन विभागाकडून योग्य ते पुरावे/अभिप्राय संबंधित समितीस दिल्या जातात.

फॉरेस्ट सर्व्हे ऑफ इंडिया यांनी प्रकाशित केलेल्या इंडिया स्टेट फॉरेस्ट रिपोर्ट, २०१७ अनुसार महाराष्ट्र राज्यात एकूण वनक्षेत्र ६१५७९ चौ.कि.मी. असून आयुक्त आदिवासी विकास, नाशिक यांच्याकडून वनहक्क दाव्याबाबत प्राप्त माहे एप्रिल, २०१८ च्या आकडेवारीनुसार वैयक्तिक दाव्यातील १०४५.८४ चौ.कि.मी. व सामुहिक दाव्यातील १०४४२.४३ चौ.कि.मी. असे एकूण ११४८८.२७ चौ.कि.मी. क्षेत्र वन हक्क पत्रक वाटप करण्यात आले आहे.

(४) फॉरेस्ट सर्व्हे ऑफ इंडिया यांनी प्रकाशित केलेल्या इंडिया स्टेट फॉरेस्ट रिपोर्ट, २०१७ अनुसार महाराष्ट्र राज्यात एकूण वनक्षेत्र ६१५७९ चौ.कि.मी. असून ते भौगोलिक क्षेत्राचे प्रमाणात २०.०१ टक्के आहे. वन जमिनीवरील अतिक्रमणासंदर्भात संकलित त्रैमासिक अहवाल मार्च, २०१८ अखेर अनुसार एकूण ६२१५५.८९५ हे. (६२१.५५८९५ चौ.कि.मी.) क्षेत्र अवैध अतिक्रमणाखाली असून, राज्याच्या वनक्षेत्राच्या प्रमाणात हे अतिक्रमण १.००९३ टक्के एवढे आहे.

अवैध अतिक्रमणे हटविण्यासाठी कृती आराखडा तयार करुन क्षेत्रिय स्तरावरून कार्यवाही करण्यात येते.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## यवतमाळ येथील विद्‌यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीच्या रकमेत तफावत असल्याबाबत

**(१०) ३४८१६ (०२-०१-२०१८). श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) यवतमाळ जिल्ह्यात सन २००९ ते सन २०१६ या कालावधीत विद्‌यार्थ्यांना वितरीत झालेल्या शिष्यवृत्तीच्या रुपये दहा कोटी रक्कमेच्या हिशेबात तफावत असल्याबाबत स्थानिक निधी लेखा परिक्षकांनी आक्षेप घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्‌नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०२-०८-२०१८) :** (१) होय,
(२) स्थानिक निधी लेखा परीक्षकांनी शिष्यवृत्ती योजनेंतर्गत यवतमाळ जिल्ह्याच्या लेखा परिक्षणात दर्शविलेल्या तफावतीच्या रक्कमेच्या पडताळणीची प्रक्रिया सुरु आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## चोपडा (जि.जळगांव) येथील आदिवासी वसतिगृहातील विद्यार्थ्यांच्या मागण्यांबाबत

**(११) ३५५४९ (०२-०१-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चोपडा (जि.जळगांव) येथील शासकीय आदिवासी वसतिगृहातील विद्यार्थ्यांनी विविध मागण्यासाठी तहसिल कार्यालयासमोर उपोषण केल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ च्या दुसऱ्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, विद्यार्थ्यांनी चोपडा ते यावल पर्यंत ५० किमी अंतर पायी जाऊन प्रकल्प अधिकाऱ्यांकडे सदर मागण्यांसदर्भात निवेदन दिले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त निवेदनाच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे काय,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (०२-०७-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) व (३) विद्यार्थ्यांनी प्रकल्प अधिकारी, यावल यांना दिलेल्या निवेदनाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात आलेली आहे.

विभागांतर्गत कार्यरत शासकीय वसतिगृहांची क्षमता वाढविण्याऐवजी वसतिगृहामध्ये प्रवेश न मिळालेल्या विद्यार्थ्यांना भोजन, निवास व इतर शैक्षणिक साहीत्य उपलब्ध करुन घेण्यासाठी थेट रक्कम विद्यार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यामध्ये जमा करण्याबाबत सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षापासून पंडीत दीनदयाल उपाध्याय स्वयम् योजना सुरू करण्यात आलेली आहे.

शासकिय आदिवासी मुला-मुलींचे वसतिगृह यांकरीता चोपडा शहरातील क्रमांक ४२ मधील ७२ आर शासकीय जमीन आदिवासी विकास विभागाच्या नावे करण्यात आलेली असून सदर जमिनीचा ताबा मिळणेबाबत जिल्हाधिकारी, जळगाव यांचेकडे प्रस्ताव सादर करण्यात आलेला आहे.

सन २०१५-१६ व सन २०१६-१७ करीता सर्व पात्र विद्यार्थी/विद्यार्थीनीं भारत सरकार शैक्षणिक शिष्यवृत्ती अदा करण्यात आलेली आहे.

शासकिय आदिवासी मुलींचे वसतिगृहातील गृहपाल श्रीमती मनिषा सैंदाणे यांची बदली करण्यात आली असून त्यांचा कार्यभार श्रीमती विजया चौधरी (प्रा.शि.) शासकिय आश्रमशाळा विष्णापूर यांचेकडे सोपविण्यात आला आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## फोंडशिरस (ता.माळशिरस, जि.सोलापूर) सहकारी संस्थेच्या सभासद शेतकऱ्यांना कर्जमाफीचा लाभ मिळण्याबाबत

**(१२) ३५६०६ (०१-०१-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) फोंडशिरस (ता.माळसिरस, जि.सोलापूर) सहकारी संस्थेचे शेतकरी सभासद हे नियमित कर्ज फेड करतात, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात तीन वेळा शेतकऱ्यांची कर्जमाफी करण्यात आली असून दुष्काळी परिस्थितीतही फोंडशिरस सहकारी संस्थेचे शेतकरी नियमित कर्ज फेड करीत असल्याने शासनाच्या कर्जमाफीचा सदर संस्थेने निषेध केला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, अशा संस्थेच्या शेतकऱ्यांच्या कर्जमाफीसाठी शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२२-०६-२०१८) :** (१) व (२) होय.

(३) छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना-२०१७ अंतर्गत शासन निर्णय, दिनांक २८/०६/२०१७ तसेच दिनांक ७/१२/२०१७ व दिनांक १२/१२/२०१७ च्या शासन निर्णयान्वये योजनेत केलेल्या बदलानंतरच्या तरतूदी विचारात घेता, फोंडशिरस, ता.माळशिरस जि.सोलापूर या संस्थेतील ६०

सभासदांपैकी दोन सभासदांचे कर्ज वाटप हे दिनांक ०१/०४/२०१५ पूर्वीचे होते. सन २०१५-२०१६ या वर्षामध्ये ५८ वाटप झालेल्या कर्जदार सभासदांपैकी एकूण ४३ सभासदांची नांवे ग्रीन लिस्टमध्ये आहेत. त्यापैकी ४२ सभासदांच्या खात्यावर कर्जमाफीच्या लाभाची रक्कम जमा झाली आहे व एका सभासदाचे नाव आधार कार्डाचा उल्लेख नसल्याने दुरूस्तीसाठी परत केले आहे. ५८ पैकी १५ सभासदांची नावे मिसमॅच यादीमध्ये प्राप्त झाली होती. ती दुरूस्त करून अपलोड केली आहेत.

शासन निर्णय दिनांक २८/०६/२०१७ नुसार संस्थेचे नियमित कर्जफेड करणारे सभासद योजनेस पात्र ठरत नसल्यामुळे कर्जमाफीच्या निषेधाचा ठराव दिनांक ५/९/२०१७ च्या वार्षिक सर्वसाधारण सभेत केला होता.तथापि, दिनांक ७/१२/२०१७ व दिनांक १२/१२/२०१७ च्या शासन निर्णयान्वये योजनेत केलेल्या बदलानंतर वरीलप्रमाणे फोंडशिरस संस्थेचे ४३ सदस्य कर्जमाफीस पात्र ठरले आहेत.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग आणि इतर मागासवर्गीयांना पाच वर्षापेक्षा जास्त वास्तव्य असलेल्या जिल्ह्यात जातीचा दाखल देण्याबाबत

**(१३) ३६१९० (०२-०१-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात मूळ गाव, जिल्हा सोडून शिक्षण, नोकरी वा इतर उदरनिर्वाहाच्या कारणास्तव अन्य जिल्ह्यात वास्तव्यास गेलेल्या व गाव, जिल्हा सोडून तीस ते चाळीस वर्षे झालेल्या अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्ग आणि इतर मागासवर्गीयांना जातीचा दाखला मिळविण्यासाठी सतत मूळ जिल्ह्यातील संबंधित कार्यालयांमध्ये जावे लागत

असणे, त्यामुळे त्यांना वेळ, आर्थिक भार, नोकरी व्यवसाय यासह अनेक प्रकारच्या अडचणींना सामोरे जावे लागणे तसेच शारिरीक व मानसिक त्रास सहन करावा लागत असल्याने सदर घटकातील व्यक्तींचे ज्या जिल्हयात किमान पाच वर्षापेक्षा जास्त काळ वास्तव्य आहे त्यांना त्या जिल्हयातच जातीचा दाखला देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत शासनाचा निर्णय पूर्ण झाला आहे काय, निर्णयाचे स्वरुप काय आहे,
(३) नसल्यास, किती कालावधी लागणे अपेक्षित आहे तसेच विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (३०-०७-२०१८) :** (१) होय.
(२) महाराष्ट अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग जातीचे प्रमाणपत्र देण्याचे व त्यांच्या पडताळणीचे विनियमन नियम, २०१२ मधील (नियम क्र.३) जातीचे प्रमाणपत्र देण्यासाठी रहिवासासंबंधातील शर्ती मधील तरतुदीमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनस्तरावर विचाराधीन आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईत लोकशाहीर अण्णाभाऊ साठ्ये यांचे आंतरराष्ट्रीय दर्जाचे स्मारक उभारण्याबाबत

**(१४) ३६३२९ (०२-०१-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईत लोकशाहीर अणाभाऊ साठे यांचे आंतराष्ट्रीय दर्जाचे स्मारक उभारण्याचा निर्णय शासनाने माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यासाठी किती निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे, स्मारकाच्या कामास प्रत्यक्ष केंव्हा सुरुवात करण्यात येणार आहे व सदर काम किती कालावधीत पूर्ण करण्यात येणार आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (०१-०८-२०१८) :** (१) होय
(२) या सदंर्भात शासन निर्णय दिनांक १८/९/२०१७ अन्वये समिती गठीत करण्यात आली असून समितीचा अहवाल/शिफारशी शासनास प्राप्त झाल्यानंतर याबाबत पुढील निर्णय घेण्यात येईल.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वसई (जि.पालघर) तालुक्यातील उपरी वीज वाहिन्या भूमिगत करण्याबाबत

**(१५) ३७०४९ (०३-०१-२०१८). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वसई (जि.पालघर) तालुक्यात पश्चिम पट्टयातील उपरी वीज वाहिन्यांमुळे ग्रामीण व शहरी भागात अनेक अपघात होत असल्याने महावितरणाकडून रुपये १७४ कोटी ५५ लाख निधी मंजूर करण्याचा प्रस्ताव तयार करण्यात आला आहे, हे खरे आहे काय.
(२) असल्यास, सदर स्थानिक नागरीकांच्या सुरक्षेच्यादृष्टीने वीज वाहिन्या किती कालावधीत भूमिगत करण्यात येणार आहेत,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (३०-०८-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
वसई मंडळांतर्गत येणाऱ्या महानगरपालिका क्षेत्रांतर्गत उपरी वाहिनी भूमिगत करण्याकरीता एकूण रुपये ३०८.९६ कोटीचा प्रस्ताव महावितरण मार्फत तयार करण्यात आला आहे.

(२) उपरी वाहिनी भूमिगत करण्याकरीता आवश्यक निधी उपलब्ध झाल्यानंतर महावितरण मार्फत ई-निविदा काढून कामे लवकरात लवकर करण्यात येतील. दरम्यान काळात स्थानिक नागरिकांच्या सुरक्षेच्यादृष्टीने अत्यावश्यक असलेली भूमिगत वाहिनीची पूर्ण करण्याची कामे उपलब्ध योजनांमध्ये पूर्ण करण्यासंबंधीचे निर्देश महावितरणच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांना देण्यात आलेले आहेत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात दिव्यांग व्यक्तीसाठी केंद्र शासनाप्रमाणे धोरण राबविणेबाबत

**(१६) ३७०५४ (०२-०१-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात दिव्यांग व्यक्तीसाठी केंद्र शासनाप्रमाणे धोरण राबविणेबाबतचा प्रस्ताव विचाराधीन असून सदर धोरणाबाबत शासनाने शासकीय विभाग तसेच जनतेकडून अभिप्राय मागविले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर अभिप्राय शासनास प्राप्त झाले आहेत काय, त्यावर शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे व त्यानुषंगाने अंमलबजावणीची सद्य:स्थिती काय आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (२७-०८-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) प्राप्त झालेल्या सूचना व हरकती तसेच सर्व संबंधित प्रशासकीय विभागाचे अभिप्राय मागविण्यात आले असून त्यांचा अंतर्भाव धोरणाच्या मसुद्यामध्ये करण्यात आला आहे. त्यास अंतिम मान्यता घेण्याची कार्यवाही सुरु आहे
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबई म्हाडाकडून अत्यल्प दरात भूखंड मिळवून इमारती उभारणाऱ्या गृहनिर्माण संस्थांनी बांधकाम न केल्याबाबत

**(१७) ३७६३६ (०६-०४-२०१८). श्री.हेमंत टकले, श्री.विक्रम काळे, श्री.किरण पावसकर, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई म्हाडाकडून अत्यल्प दरात भूखंड मिळवून इमारती उभारणाऱ्या गृहनिर्माण संस्थांनी तसेच शिक्षण संस्थांनी भुईभाडे भरलेले नाही अशा किती गृहनिर्माण संस्था आहेत,

(२) असल्यास, ज्या गृहनिर्माण संस्था व शिक्षण संस्थांनी भुईभाडे भरले नाही त्यांची नावे काय आहेत,

(३) असल्यास, ज्या संस्थांनी भूखंडावर बांधकाम केलेले नाही तसेच भुईभाडे भरले नाही त्यांच्यावर म्हाडाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) असल्यास, ज्या संस्थांनी भूखंड घेतले असून गत १५ वर्षात बांधकाम केले नाही त्यांच्याकडून भूखंड परत घेण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (११-०९-२०१८) :** (१) व (२) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा यांच्या अहवालानुसार मुंबई म्हाडाकडून अत्यल्प दरात भूखंड मिळवून इमारती उभारणाऱ्या परंतु भुईभाडे थकीत असणाऱ्या एकूण दोन गृहनिर्माण संस्था आहेत. त्या संस्थांची नावे १) एक्सलन्सी सह. गृह. संस्था, वर्सोवा. २) गोल्डन सॅन्डस् सह. गृह. संस्था, वर्सोवा अशी आहेत.

मुंबई म्हाडाकडून अत्यल्प दरात भूखंड मिळवून इमारती उभारणाऱ्या परंतु भुईभाडे भरलेले नाही अशी कोणतीही शिक्षण संस्था नाही.

(३) व (४) भुईभाडे भरण्यासंदर्भात सदरहू संस्थांना पत्रव्यवहार करण्यात आला आहे. तसेच आर.आर.सी. चा प्रस्ताव जिल्हाधिकारी कार्यालयामध्ये पाठविला आहे. ज्या संस्थांनी भूखंडावर बांधकाम केलेले नाही, अशा संस्थांचे

भूखंड वाटपाचे आदेश रद्द करण्यासाठी कार्यवाही सुरु आहे, असे उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, म्हाडा यांनी कळविलेले आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## इंदिरा गांधी वैद्यकिय महाविद्यालय व रूग्णालय येथे परिचारिकांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(१८) ३८२८१ (०४-०४-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास : तारांकित प्रश्न क्रमांक ३१०१२ ला दिनांक २८ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर इंदिरा गांधी वैद्यकिय महाविद्यालय व रूग्णालयात दररोज प्रसूतीसाठी अनेक महिला दाखल होतात, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त रूग्णालयात किती परिचारीका कार्यरत आहेत व त्या किती शिप्टमध्ये काम करतात, तसेच सदर रुग्णालयामध्ये परिचारिकांची पदे रिक्त आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने परिचारिकांची रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१०-०८-२०१८) :** (१) होय.
(२) होय.

इंदिरा गांधी वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयात ३९४ परिचारिका कार्यरत आहेत व त्या ३ शिष्टमध्ये काम करतात. तसेच सदर रुग्णालयात परिचारिकांची ४८ पदे रिक्त आहेत.
(३) सदर रिक्त पदे संचालनालयामार्फत भरण्याची कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## यवतमाळ जिल्ह्यातील सिंचन विहिरींच्या बांधकामाबाबत

**(१९) ३८३०१ (०४-०४-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, अ‍ॅड.राहुल नार्वेकर, श्री.हरिसिंग राठोड, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर, अ‍ॅड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत संपूर्ण राज्यात अनेक सिंचन विहीरी अर्धवट स्थितीत असून यवतमाळ जिल्ह्यासाठी सिंचन विहिरीसाठी कोट्यवधी रुपयाचा निधी दिला असता मारेगांव पंचायतीशिवाय इतर पंचायत समित्यांनी धडक सिंचन योजनेची कामे झाली नसल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यवतमाळ जिल्ह्यात वैयक्तिक सिंचन विहिरीची कामे हाती घेण्यात आल्यापैकी सुमारे पाच हजार विहिरींची कामे अर्धवट अवस्थेत आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) तसेच यवतमाळ जिल्ह्यात शेतकऱ्यांच्या वाढत्या आत्महत्त्या लक्षात घेवून शासनाने सिंचन सुविधा वाढविण्याच्या कार्यक्रमांतर्गत विदर्भ सिंचन विहिरी बांधकामाच्या २७०० विहिरींची बांधकामे हाती घेतली होती, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त विहिरींपैकी १२९७ विहिरींची कामे निधी अभावी प्रलंबित असून सदर विहिरींची कामे दिनांक ३० जून, २०१७ रोजीपर्यंत पूर्ण करण्याची मुदत संपल्याने जिल्हापरिषदेचे स्थायी समितीच्या बैठकीत सदर कामे पूर्ण करण्यासाठी दिनांक ३१ ऑगस्ट, २०१८ रोजीपर्यंत पूर्ण करण्यासाठी शासनाकडे मुदत मागितली आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने काय निर्णय घेतला आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (३०-०६-२०१८) :** (१) हे खरे नाही.

(२) व (३) सन २०१७-१८ मध्ये धडक सिंचन विहिर योजनेंतर्गत यवतमाळ जिल्ह्यास ४८०० विहिरींचा लक्षांक देण्यात आला असून, त्यापैकी ३२६६

विहिरी मंजुर झाल्या आहेत. ३२०६ विहीरींना प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. २८७२ विहिरींना कार्यारंभ आदेश देण्यात आले असून, १३४४ विहिरी प्रगतीपथावर आहेत. तसेच १८ विहीरी पूर्ण झालेल्या आहेत.
(४) व (५) दिनांक ८/११/२०१७ च्या शासन निर्णयान्वये यवतमाळ जिल्ह्यास रुपये २० कोटी इतका निधी उपलब्ध करून दिल्याने निधी अभावी विहिरींची कामे प्रलंबित नाहीत. विभागाच्या दिनांक ७/११/२०१७ च्या परिपत्रकामध्ये प्रगतीपथावर असलेल्या विहिरींची कामे दिनांक ३०/६/२०१८ पर्यंत पूर्ण करण्यास मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

---

## परभणी जिल्ह्यातील वीज मंडळाच्या प्रलंबित कामांबाबत

**(२०) ३८४८१ (०५-०४-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण : दिनांक १९ डिसेंबर, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ७ मधील प्रश्न क्रमांक १५०४५ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी जिल्ह्यातील इन्फ्रा-२, दिनदयाल व इतर योजनेतून करण्यात येणारी कामे विहित मुदतीत करण्यात न आल्याने सदरील कंत्राटदारांची कामे रद्द करण्याचा निर्णय ऊर्जा विभागाने सन २०१६ च्या दरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विहित मुदतीत कामे न करता विकास कामे रखडविणाऱ्या कंत्राटदारांची व प्रशासकीय अधिकाऱ्यांच्या उदासीनतेची चौकशी करून त्यांच्यावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२०-०८-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) महावितरण कंपनीतर्फे कामाची चौकशी करुन निविदेतील तरतुदीनुसार सदरचे कंत्राट रद्द करण्याची कार्यवाही करण्यात आली आहे. तसेच

कंत्राटादारावर निविदेतील तरतुदीनुसार दंडात्मक कारवाई देखील करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत शेततळे ग्रामपंचायतीमार्फत देण्याच्या प्रस्तावाबाबत

**(२१) ३८९४२ (०४-०४-२०१८). श्री.आनंदराव पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक २५५९४ ला दिनांक ६ डिसेंबर, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महात्मा गांधी राष्ट्रीय रोजगार हमी योजनेतंर्गत ग्रामपंचायतीकडून १५x१५x३ मी. आकारमानाचे शेततळे करण्याची परवानगी दिनांक २५ सप्टेंबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयानुसार दिली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उल्लेखित आकारमानाचे शेततळे अत्यंत लहान व उपयोगक्षम नसल्यामुळे किमान ३०x३०x३ मी. आकारमानाचे शेततळे करण्याची परवानगी ग्रामपंचायतीला देण्याची मागणी लोकप्रतिनिधीनी दिनांक २८ सप्टेंबर, २०१५ रोजी करुनही याबाबत कोणतीही कार्यवाही करण्यात आली नसल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सातारा, सांगली व सोलापूर जिल्ह्यातील अनेक तालुके सतत दुष्काळग्रस्त असून तेथील सिंचन सुविधा वाढविणे आणि तेथील मजुरांना तत्परतेने काम उपलब्ध करण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (०३-०७-२०१८) :** (१) होय.

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत शेततळयांची कामे ग्रामपंचायत/यंत्रणामार्फत घेण्यास शासन निर्णय दिनांक १४ सप्टेंबर, २०१५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार

ग्रामपंचायतीमार्फत छोट्या आकारमानांच्या शेततळ्यांची कामे (१०x१०x३ मी., १५x१०x३ मी., व १५x१५x३ मी.) अनुज्ञेय आहेत.

(२) शासन निर्णय दिनांक १३ जुलै, २०१६ अन्वये ३०x३०x३ मी. आकारमानाचे शेततळे घेण्यास परवानगी देण्यात आलेली आहे.

(३) दुष्काळाच्या पार्श्वभूमीवर “मागेल त्याला शेततळे” ही योजना शासनाने दिनांक १७ फेब्रुवारी, २०१६ च्या शासन निर्णयान्वये जाहीर केली आहे. त्याचप्रमाणे महात्मा गांधी नरेगांतर्गत शेततळ्यांची कामे अनुज्ञेय आहेत. सातारा, सांगली व सोलापूर जिल्हयांमध्ये कामांचे शेल्फ तयार ठेवण्यात आले असून, कामाची मागणी होताच कामे उपलब्ध करून दिली जातात.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ग्रामीण भागातील रुग्णांना राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजनेचा लाभ मिळण्याबाबत

**(२२) ३९०९५ (०४-०४-२०१८). डॉ.परिणय फुके : तारांकित प्रश्न क्रमांक ३५०४३ ला दिनांक ११ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दारिद्रय रेषेखालील नागरिकांना वैदयकीय सेवेचा लाभ घेता यावा या उद्देशाने सुरु करण्यात आलेली राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजना शहर व मध्यमवर्गीयांपूरतीच मर्यादित आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, बीड, भंडारा, गडचिरोली, गोंदिया, हिंगोली, जालना, नंदुरबार, उस्मानाबाद, रत्नागिरी, सातारा, सिंधुदुर्ग आणि वाशिम या जिल्हयांमध्ये एकूण ८९४ अंगीकृत रूग्णालयांपैकी फक्त ६३ रूग्णालये अंगीकृत आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन राजीव गांधी जीवनदायी योजनेचा लाभ ग्रामीण भागातील रुग्णांना मिळण्यासाठी सदर योजना गाव, खेडी येथे पूर्णक्षमतेने राबविण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०२-०७-२०१८) :** (१) हे खरे नाही.

सद्य:स्थितीत राजीव गांधी जीवनदायी आरोग्य योजनेतील मूळ तरतूदी कायम ठेवून सदर योजना महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना या नावाने राबविण्यात येत आहे. सदर योजना केवळ शहर व मध्यमवर्गीयांपुरतीच मर्यादित नसुन योजनेमध्ये अंत्योदय, अन्नपुर्णा, पिवळे व केशरी शिधापत्रिका धारक कुटुंबे तसेच १४ शेतकरी अर्वषणग्रस्त जिल्हयातील शुभ्र शिधापत्रिकांधारक अशी ग्रामीण व शहरी भागातील एकूण २ कोटी २२ लक्ष लाभार्थी कुटुंबे समाविष्ट आहेत.

(२) योजनेंतर्गत अंगीकृत एकूण ४९१ अंगीकृत रूग्णालयांपैकी बीड, भंडारा, गडचिरोली, गोंदिया, हिंगोली, जालना, नंदुरबार, उस्मानाबाद, रत्नागिरी, सातारा, सिंधुदुर्ग आणि वाशिम या जिल्हयांमध्ये ६३ रूग्णालये अंगीकृत करण्यात आलेली आहेत. विमा कंपनी व सोसायटीमधील करारानुसार योजनेंतर्गत रूग्णालये अंगीकृत करण्याच्या कमाल मर्यादेत सदर जिल्हयांमध्ये रूग्णालये अंगीकृत करण्यात आलेली आहेत.

(३) व (४) सदर योजनेचा लाभ ग्रामीण भागातील रूग्णांना मिळण्यासाठी योजना गाव, खेडी येथे पूर्ण क्षमतेने राबविण्याच्या उद्देशाने आतापर्यंत अंगीकृत रूग्णालयांनी ८८१३ आरोग्य शिबीरे घेतली असून जळगाव, नंदुरबार बीड, नाशिक, अकोला, सांगली व मुंबई (घाटकोपर) येथे महाआरोग्य शिबीरे घेण्यात आलेली आहेत. योजनेंतर्गत आतापर्यंत १७,५०,६८५ शस्त्रक्रिया झाल्या आहेत. रेडीओ, दुरदर्शन, वर्तमानपत्रे, रेल्वे, एस.टी.बस या माध्यमातून योजनेची प्रचार व प्रसिद्धी करण्यात येत आहे.

---

## हिंगोली जिल्हयात रोजगार हमी योजनेंतर्गत अहिल्यादेवी होळकर सिंचन विहिरीकरीता शेतकऱ्यांनी केलेल्या अर्जाबाबत

**(२३) ३९२१३ (०४-०४-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हिंगोली जिल्हयात शासनाच्या रोजगार हमी योजनेंतर्गत अहिल्यादेवी होळकर सिंचन विहिरीकरीता माहे मे, २०१७ अखेर किती शेतकऱ्यांनी पंचायत समितीमध्ये अर्ज केले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, किती शेतकऱ्यांच्या सिंचन विहिरींच्या कामांना मंजूरी देण्यात आली, तसेच किती विहिरींच्या कामाला सुरुवात केली आहे,
(३) तसेच, याबाबत किती शेतकऱ्यांना अनुदान देण्यात आले आहे ?

**श्री.जयकुमार रावल (०३-०७-२०१८) :** (१) हिंगोली जिल्हयात माहे मे, २०१७ अखेर ८६५५ शेतकऱ्यांनी पंचायत समिती अंतर्गत सिंचन विहिरीकरीता अर्ज केले आहेत.
(२) १७९३ सिंचन विहिरींच्या कामांना मंजूरी देण्यात आली असून ७५१ सिंचन विहिरींच्या कामांना सुरुवात केली आहे.
(३) ७४४ सिंचन विहिरीवर काम केलेल्या मजुरांना मजुरी देण्यात आली आहे.

---

## "मॅग्नेटिक महाराष्ट्र-कव्हर्जन्स २०१८" या औद्योगिक व आर्थिक प्रदर्शनाबाबत

**(२४) ३९८०३ (०५-०४-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाराष्ट्र औद्योगिक विकास मंडळतर्फे "मॅग्नेटिक महाराष्ट्र-कव्हर्जन्स २०१८" या औद्योगिक व आर्थिक प्रदर्शनाचे दिनांक १८ ते २० फेब्रुवारी, २०१८ या कालावधीत मुंबई येथे आयोजन करण्यात आले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रदर्शन भरवण्याचा शासनाचा उद्देश काय होता,
(३) तसेच सदर उद्देशाची फलनिष्पत्ती काय आहे ?

**श्री.सुभाष देसाई (२८-०८-२०१८) :** (१) खरे आहे.

"मॅग्नेटिक महाराष्ट्र कन्व्हेजन्स २०१८" हा कार्यक्रम दिनांक १८ ते २० फेब्रुवारी, २०१८ या कालावधीत मुंबई येथे आयोजित करण्यात आला होता.

(२) व (३) "मॅग्नेटिक महाराष्ट्र कन्व्हेजन्स २०१८" या कार्यक्रम आयोजित करण्यामागचा शासनाचा उद्देश खालीलप्रमाणे होता :-

१. राज्यात उद्योगधंद्यात गुंतवणूक वाढविणे.
२. कुशल मनुष्यबळ तयार करणे, रोजगार निर्मिती करणे.
३. महाराष्ट्र राज्याची २०२५ पर्यंत "ट्रिलियन डॉलर इकॉनॉमी" कडे वाटचाल करणे.
४. इज ऑफ डूइंग बिझनेस रिफॉर्म्सवर भर देणे.

"मॅग्नेटिक महाराष्ट्र कन्व्हेजन्स २०१८" या औद्योगिक व आर्थिक कार्यक्रमांतर्गत राज्यात विविध क्षेत्रात ३,९६५ गुंतवणूक हेतू प्रस्ताव करण्यात आले. त्याद्वारे रुपये १२ लक्ष कोटी गुंतवणूक व ३७ लक्ष रोजगार निर्मिती अपेक्षित आहे.

---

## राज्यात बाळासाहेब ठाकरे स्मृती मातोश्री ग्रामपंचायत बांधणी योजनेंतर्गत स्वत:च्या मालकीची इमारत बांधण्यात येणार असल्याबाबत

**(२५) ३९९०० (०४-०४-२०१८). श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात २८ हजार ग्रामपंचायतींपैकी ५ हजार २५२ ग्रामपंचायतींना बाळासाहेब ठाकरे स्मृती मातोश्री ग्रामपंचायत बांधणी योजनेंतर्गत स्वत:च्या मालकीची इमारत बांधण्यात येणार असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने सदर योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी निधीची तरतूद करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१८-०७-२०१८)** : (१) राज्यातील एकूण २८,००६ ग्रामपंचायतींपैकी ज्या ग्रामपंचायतींना स्वत:च्या कार्यालयासाठी स्वतंत्र इमारत नाही, अशा जवळपास ४,२५२ ग्रामपंचायती आहेत. सदर ग्रामपंचायतींना स्वतंत्र कार्यालयाची इमारत बांधण्यासाठी मा.बाळासाहेब ठाकरे स्मृती मातोश्री ग्रामपंचायत बांधणी योजना सुरु करण्याबाबत जानेवारी, २०१८ च्या मंत्रिमंडळ बैठकीत मान्यता देण्यात आली आहे.
(२) व (३) या योजनेसाठी पावसाळी अधिवेशन २०१८ मध्ये निधीची तरतूद करण्यात येणार आहे.

---

## मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेत मेळघाटातील कोअर व बफर क्षेत्रातील कामे वन विभागाच्या परवानगी अभावी प्रलंबित असल्याबाबत

**(२६) ३९९०३ (०४-०४-२०१८). श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेत (अमरावती) मेळघाटातील कोअर व बफर क्षेत्रातील चार कामे वन विभागाच्या परवानगी अभावी प्रलंबित असल्याचे माहे डिसेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, परवानगी अपूर्ण असलेल्या सर्व कामांचा एकत्र विचार करता परवानगी प्रक्रिया पूर्ण करण्याच्या सूचना मा.मुख्यमंत्री महोदयांनी घेतलेल्या आढावा बैठकीत दिल्या आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२२-०६-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) होय, हे खरे आहे.
(३) वनविभागाकडे मंजुरीस्तव सादर केलेल्या ४ कामांच्या प्रस्तावापैकी १ कामास मंजूरी प्राप्त होऊन मे, २०१८ पासुन सदर काम प्रगतीत आहे. उर्वरित ३ कामांना वन विभागाची अदयाप परवानगी प्राप्त नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अमळनेर (जि.जळगांव) तालुक्यातील सिंचन विहिरींना तालुका पंचायत समिती कार्यालयाद्‌वारे प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

**(२७) ४०२१७ (०४-०४-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अमळनेर (जि.जळगांव) तालुक्यातील सिंचन विहिरींना तालुका पंचायत समिती कार्यालयाद्‌वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत नसल्याचा प्रकार निदर्शनास आला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने संबंधित अधिकाऱ्यांवर कारवाई करुन सिंचन विहिरी यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (०३-०७-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
शासनपत्र दिनांक २८ नोव्हेंबर, २०१७ अन्वये मनरेगांतर्गत सिंचन विहिरींना प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार मुख्य कार्यकारी अधिकारी यांना देण्यात आले आहेत.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अमळनेर (जि.जळगांव) तालुक्यातील गांधली पाझर तलाव दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध होणेबाबत

**(२८) ४०२२१ (०४-०४-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अमळनेर (जि.जळगांव) तालुक्यातील गांधली पाझर तलाव गेल्या अनेक वर्षापासून ना दुरुस्त असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, स्थानिक लोकप्रतिनिधी व नागरिकांनी अनेक वेळा मागणी करूनही दुरुस्तीसाठी आवश्यक निधी उपलब्ध करण्यात आला नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पाझर तलावाच्या दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध करुन तलावांची दुरुस्ती करण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०५-०७-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.

(३) गांधली गाव जलयुक्त शिवार अभियान सन २०१७-१८ मध्ये समाविष्ट असून जिल्हा नियोजन समितीद्वारे गांधली पाझर तलाव दुरुस्तीचे काम मंजुर करण्यात आले आहे. सदर कामाची निविदा प्रक्रिया पूर्ण झाली असून कार्यारंभ आदेश देवुन माहे जून, २०१८ पूर्वी काम पूर्ण करण्याचे नियोजन आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## शासनाकडून "मागेल त्याला शेततळे" या योजनेंतर्गत वाटप करण्यात येणाऱ्या शेततळ्याचे अनुदानाबाबत

**(२९) ४०३७१ (०४-०४-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शेतीचे सिंचन वाढविण्यासाठी शासनाकडून “मागेल त्याला शेततळे” ही योजना सुरु केली असून या योजनेंतर्गत गडचिरोली जिल्ह्यात अंदाजे ३६२१ शेतकरी पात्र झाले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, कृषी विभागाच्या उदासीनतेमुळे शेततळ्यांसाठी पात्र शेतकऱ्यांपैकी गेल्या १० महिन्यात अवघ्या ३५२ शेतकऱ्यांना शेततळ्याचे अनुदान वाटप करण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) तसेच, उर्वरित शेतकऱ्यांना त्यांच्या शेततळ्यांच्या अनुदानाचे वाटप न करण्याची कारणे काय आहेत,
(४) असल्यास, अनुदान वाटप करण्यास दिरंगाई करणाऱ्या अधिकारी व कर्मचाऱ्यांवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (३०-०६-२०१८) :** (१) होय. दिनांक ८/६/२०१७ अखेर गडचिरोली जिल्ह्यात “मागेल त्याला शेततळे” या योजनेंतर्गत ३,६२१ शेतकरी पात्र ठरले होते. आजमितीस ६,४६२ शेतकरी पात्र ठरले आहेत.
(२) हे खरे नाही. गडचिरोली जिल्ह्यात लाभार्थ्यांनी २,५०३ कामे पूर्ण केली असून आजमितीस १,९५६ शेततळयांचे अनुदान वितरीत करण्यात आले आहे.
(३), (४) व (५) उर्वरीत शेततळयांचे अनुदान वाटप करण्याची कार्यवाही सुरु आहे. त्यामध्ये दिरंगाई झालेली नाही.

---

## महात्मा ज्योतिबा फुले जनआरोग्य अभियानाबाबत

**(३०) ४०४४४ (०४-०४-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासनाच्या महात्मा ज्योतिबा फुले जनआरोग्य अभियानात नांदेड शहरातील व जिल्ह्यातील खाजगी नामांकित रुग्णालयांचा सहभाग कमी असल्याचे दिनांक २८ डिसेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या अभियानात खाजगी नामांकित रुग्णालयाचा सहभाग वाढावा व योजनेची व्याप्ती वाढावी यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. दीपक सावंत (०९-०८-२०१८) :** (१) हे खरे नाही. नांदेड जिल्हयात एकूण १० रूग्णालये अंगीकृत असून त्यापैकी ८ खाजगी व २ सरकारी रूग्णालये आहेत.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## माहूर (जि.नांदेड) येथील आरक्षित वन जमिनीवरील झाडांची अवैधरित्या कत्तल करण्यात आल्याबाबत

**(३१) ४०६८४ (०४-०४-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) माहूर (जि.नांदेड) येथील आरक्षित वन जमिनीवरील मोठ्या प्रमाणात बहुमोल किंमतीच्या झाडांची अवैधरित्या कत्तल करण्यात येऊनही वनपरिक्षेत्र व वनपाल यांच्याविरुध्द संबंधित पोलीस स्टेशनला गुन्हा दाखल करण्यात आला नसल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने दोषी वनपरिक्षेत्र व वनपाल यांच्याविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२६-०६-२०१८) :** (१), (२) व (३) माहूर (जि.नांदेड) येथील सर्वे क्र.६ (सी) व ६ (डी) मधील क्षेत्रात शासकीय साग वृक्ष तोडीची परवानगी तत्कालीन वृक्ष अधिकारी यांनी नाकारली असताना अतिरिक्त कार्यभारात असलेले वनपरिक्षेत्र अधिकारी यांनी दिनांक १३/१२/२०१७ ला वृक्षतोडीची परवानगी दिल्याने २०२ साग वृक्षांची अवैधरित्या कटाई झाल्याचे आढळले आहे. याप्रकरणी भारतीय वन अधिनियम, १९२७ अंतर्गत वनगुन्हे नोंदविण्यात आले आहेत. सदर प्रकरणी वनपरिक्षेत्र अधिकारी व वनपाल यांना दिनांक २०/१/२०१८ रोजी निलंबित करण्यात आले आहे. तसेच त्यांचेविरुध्द पोलीस स्टेशनला गुन्हा दाखल करण्यासाठी उपवनसंरक्षक, नांदेड यांनी त्यांचेकडील दिनांक १७/३/२०१८, २१/४/२०१८ व दिनांक १०/५/२०१८ च्या पत्रान्वये पोलीस अधीक्षक, नांदेड यांना विनंती करण्यात आली आहे.

---

## उमरी तालुक्यातील (जि.नांदेड) सोमठाणा येथील अंगणवाडी सेविकेचा मृत्यू झाल्याबाबत

**(३२) ४०७२५ (०४-०४-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, डॉ.सुधीर तांबे, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **महिला व बालविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उमरी तालुक्यातील (जि.नांदेड) सोमठाणा येथील अंगणवाडी सेविका सुमन बालाजी शहापुरे यांचा पोलिओचा सर्व्हे करताना चक्कर येऊन जागीच मृत्यू झाला असल्याचे दिनांक ३१ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने मृत अंगणवाडी सेविकेच्या कुटुंबियांना खास बाब म्हणून आर्थिक मदत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१९-०६-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) एकात्मिक बालविकास सेवा योजनेंतर्गत अंगणवाडी कर्मचाऱ्यांना एल.आय.सी. योजनेंतर्गत सेवानिवृत्ती / राजीनामा / मृत्यू / सेवेतून काढून टाकल्यानंतर शासन निर्णय दिनांक ३० एप्रिल, २०१४ नुसार देण्यात येणारे लाभ अंगणवाडी सेविकेच्या कुटुंबियांना लाभ देण्याबाबत कार्यवाही करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नांदेड जिल्ह्यातील हदगाव सामाजिक वनीकरण विभागामार्फत आष्टी ते उमरी (जं) या रस्त्यावर दुतर्फा झाडे लावून लाखो रुपयांचा खर्च करण्यात आल्याबाबत

**(३३) ४०७२८ (०४-०४-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नांदेड जिल्ह्यातील हदगाव सामाजिक वनीकरण विभागामार्फत आष्टी ते उमरी (जं) या रस्त्यावर दुतर्फा झाडे लावून लाखो रुपयांचा खर्च करण्यात आला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, प्रशासनाच्या दुर्लक्षामुळे या झाडांची देखभाल होत नसून ही झाडे पाण्याअभावी वाळून गेली आहेत, त्यामुळे येथील जनतेत संताप व्यक्त होत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, ही झाडे रोहयोंतर्गत लावताना मोठा अपहार झाला आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (११-०९-२०१८) :** (१) व (२) अंशत: खरे आहे.

सन २०१७ च्या पावसाळयात आष्टी ते तामसा रस्ता दुतर्फा ६ किमी साईडवर “भरीव वनीकरण कार्यक्रम (पानवहाळ)” या योजनेंतर्गत वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण परिक्षेत्र हदगांव यांनी वनीकरण केले आहे. सदर रस्ता आष्टी ते उमरी (जं) नसून आष्टी ते तामसा असा आहे. या कामात एकूण ३००० रोपांची लागवड करण्यात आलेली आहे. या कामासाठी आतापर्यंत रुपये ७,२९,६२९/ इतका खर्च झालेला आहे.

सदर वृक्षलागवडीपैकी मे, २०१८ मध्ये १९८० रोपे जिवंत आहेत.

(३) सदर काम हे रोहयोमधून झालेले नाही.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात फळबागा लागवड वाढविण्याबाबत

**(३४) ४०८४३ (०४-०४-२०१८). श्री.रामहरी रुपनवर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रोजगार हमी योजनेच्या नव्या रचनेत कृषी आणि कृषी संलग्न क्षेत्राशी संबंधित अकरा योजनांचा समावेश करण्यात आला असून, त्यापैकी पाच योजना कृषी विभागाशी संबंधित आहेत, तथापि योजना राबविताना महसूल विभागाने कृषी विभागावर अन्याय केला असून, फळबागा वाढविण्यासाठी शेतकरी निवडीच्या अटी कृषी विभागाऐवजी महसूल विभाग ठरवित आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यामुळे सरकारी बंधने अधिक कडक झाल्यामुळे त्याचा परिणाम फळबागा न वाढण्यात झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सन २०१७-१८ साली ९४ हजार हेक्टर क्षेत्रावर फळबागा उभारण्याचे उद्दिष्ट असतांना माहे डिसेंबर, २०१७ अखेर केवळ १५ हजार हेक्टरवर शेतकऱ्यांनी फळबागा उभारल्या असून, शेतकरी नव्या योजना

राबवत नसल्याची बाब माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने फळबागा वाढविण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (३०-०६-२०१८) :** (१), (२) व (३) हे खरे नाही.

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत फळबाग लागवड कार्यक्रमाची क्षेत्रियस्तरावर प्रभावी अंमलबजावणी करण्याच्यादृष्टीने दिनांक ३ सप्टेबर, २०१६ च्या शासन निर्णयान्वये कृषी विभागाला अमंलबजावणी यंत्रणा म्हणून घोषित करण्यात आलेले आहे. तसेच कृषी विभागाला अंदाजपत्रक तयार करणे, ई-मस्टर भरणे व पारीत करणे, कुशल व अकुशल मजुरीची देयके प्रदान करणे, तांत्रिक मान्यता देणे इ. अधिकार देण्यात आले आहेत या योजनेंतर्गत सन २०१७-१८ या वर्षात १६०३० हेक्टर क्षेत्रावर फळबाग लागवड करण्यात आली आहे.
(४) व (५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## परळी (जि.बीड) तालुक्यातील लाभार्थ्यांना संजय गांधी निराधार अनुदान योजनेचा लाभ मिळण्याबाबत

**(३५) ४०९१३ (०५-०४-२०१८). श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परळी (जि.बीड) तालुक्यातील दिनांक १ जानेवारी, २०१७ ते ३१ जानेवारी, २०१८ या कालावधीत संजय गांधी निराधार अनुदान योजनेंतर्गत आर्थिक सहाय्य मिळावे म्हणून किती ग्रामस्थांनी रितसर तहसिलदार, परळी यांचेकडे अर्ज सादर केले आहेत,

(२) असल्यास, सदरहू योजनेंतर्गत अर्ज केलेल्या किती ग्रामस्थांचे अर्ज मंजूर होऊन त्यांना संजय गांधी निराधार योजना लागू करण्यात आली आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.राजकुमार बडोले (२६-०७-२०१८) :** (१) व (२) परळी तालुक्यामध्ये १ जानेवारी, २०१७ ते ३१ जानेवारी, २०१८ या कालावधीत संजय गांधी निराधार अनुदान योजनेंतर्गत ८३८ व श्रावणबाळ सेवा राज्यनिवृत्तीवेतन योजनेंतर्गत ७१८ असे एकूण १५५६ अर्ज ग्रामस्थांनी केले आहेत. दिनांक २७/०३/२०१८ रोजी संजय गांधी निराधार अनुदान योजना समितीची बैठक घेण्यात आली असून त्यामध्ये ९८५ अर्ज मंजूर, २०५ अर्ज नामंजूर व ३६६ अर्ज त्रुटी पुर्ततेसाठी प्रलंबित ठेवण्यात आले आहेत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सांगली जिल्ह्यातील हरिपूर परिसरात मगरीचा वावर असल्याबाबत

**(३६) ४०९९९ (०४-०४-२०१८). श्री.हेमंत टकले, श्री.विक्रम काळे, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.ख्वाजा बेग, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.रामराव वडकुते, श्री.जगन्नाथ शिंदे :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सांगली येथील कृष्णा-वारणा नदीच्या संगमावर आणि सांगलीपासून अवघ्या तीन कि.मी. अंतरावर असलेल्या हरिपूर परिसरातील गणपती मंदिराच्या मागे मगरीचा वावर असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, नदीकाठी मगरीच्या हत्येचे चार प्रकार उघडकीस आल्याने याबाबत चौकशी करण्याबाबतचे निवेदन जिल्हाधिकारी, सांगली यांना देण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने मगरीपासून शेतकऱ्यांचे तसेच ग्रामस्थांचे संरक्षण करण्याचेदृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२१-०९-२०१८) :** (१) हरिपूर परिसरातील गणपती मंदिराच्या मागे मगरीचा वावर असल्याची बाब खरी आहे.

(२) सांगली वन परिक्षेत्रात चार मगरींचा मृत्यू झाल्या असल्याचे निदर्शनास आले आहे. तथापि, याबाबत चौकशी करण्याबाबचे निवेदन जिल्हाधिकारी, सांगली यांना प्राप्त झालेले नाही.

(३) सदर प्रकरणांमध्ये प्रथम गुन्हा रिपोर्ट नोंदविण्यात आला असून चौकशी प्रगतीपथावर आहे.

सांगली जिल्हयातील मौजे हरिपूर ते आमणापूर या कृष्णा नदीच्या पात्रात मगरीचे हल्ल्यांपासून संरक्षणाचेदृष्टीने खालील उपाययोजना करण्यात आल्या आहेत.

- जनमाणसात प्रबोधन होण्याच्या दृष्टीकोनातून नदी किनारी खबरदारी घेणेबाबत माहिती दर्शक फलक लावण्यात आलेले आहेत.
- मगर प्रवण क्षेत्रात वनविभागामार्फत वेळोवेळी गस्त घालण्यात येते.
- सांगली वनविभागत आपात्कालीन स्थिती हाताळण्याकरीता बचाव पथक (Rescue Team) गठीत करण्यात आलेले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजनेच्या अहवालाबाबत

**(३७) ४११२५ (०५-०४-२०१८). श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सर्व उपसा सिंचन योजना सौर ऊर्जेवर आणण्यासाठी धोरण निश्चित करणे तसेच मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजनेच्या कामाला गती देण्याचे निर्देश शासनाने दिले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यासंदर्भात विदर्भ सिंचन विकास महामंडळाचे संचालक यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्यात आली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, समितीने आपला अहवाल सादर केला आहे काय, सदर अहवालानुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२६-०७-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे. राज्यातील सर्व उपसा सिंचन योजना सौर ऊर्जेवर आणण्यासाठी धोरण निश्चिती करण्यासाठी दिनांक ६ फेब्रुवारी, २०१८ च्या शासन निर्णयान्वये महासंचालक, महाऊर्जा यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे.

तसेच मुख्यमंत्री सौर कृषी वाहिनी योजनेची परिणामकारक अंमलबजावणी होण्याकरीता व या योजनेस गती देण्यासाठी तसेच यामध्ये येणाऱ्या अडचणींचे तातडीने निवारण करण्यासाठी दिनांक १७ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयान्वये सदर योजनेत सुधारणा करण्यात आल्या आहेत.

(२) व (३) जलसंपदा विभागाने शासन निर्णय दिनांक २८ फेब्रुवारी, २०१८ अन्वये कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत केली आहे.

सदर समितीमार्फत राज्यातील सर्व उपसा सिंचना योजना सौर ऊर्जेवर कार्यान्वित करणेबाबत सर्व समावेशक धोरण तयार करणेकरीता कामकाज सुरू असून शासनास ठोस शिफारशी करण्याबाबत अहवाल सादर करण्याची कार्यवाही समितीच्या स्तरावरून सुरू आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात “मनरेगा” योजनेची अंमलबजावणी करण्याबाबत

**(३८) ४११६६ (०४-०४-२०१८). डॉ.सुधीर तांबे** : सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात “मनरेगा” च्या रोजगार निर्मितीत घट झाली असून सन २०१६-१७ मध्ये फक्त ४९ दिवस सरासरी प्रतिकुटुंब रोजगार मिळाली असल्याचे दिनांक ९ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील मजूरांचे होणारे स्थलांतर थांबविण्यासाठी या योजनेची परिणामकारक अंमलबजावणी करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (२८-०६-२०१८) :** (१) अंशत: खरे आहे
(२) हे खरे नाही. तथापि मजुरांनी जास्तीत जास्त प्रमाणात कामाची मागणी नोंदविण्याकरीता प्रचार, प्रसिध्दी करण्यात येत असून, ग्रामसभांचे आयोजन करून त्याद्वारे मजुरांचे समुपदेशन करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात औषधनिर्माणशास्त्र (फार्मसी) अभ्यासक्रमाची नविन महाविद्यालये सुरु केल्याबाबत

**(३९) ४१२९० (०१-०८-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील अभियांत्रिकी महाविद्यालयास बिकट परिस्थितीला सामोरे जावे लागत असल्याने या संस्थाचालकांनी औषधनिर्माणशास्त्र (फार्मसी) अभ्यासक्रमाकडे लक्ष केंद्रीत केले असून यंदा ४२ नविन महाविद्यालये सुरु करण्यात आली आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, ज्याप्रमाणे अभियांत्रिकी अभ्यासक्रमांच्या रिक्त जागांचा प्रश्न निर्माण झाला आहे त्याप्रमाणे औषधनिर्माण शास्त्राच्या अभ्यासक्रमांची स्थिती होण्याची शक्यता आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-०९-२०१८) :** (१) शैक्षणिक वर्ष २०१८-१९ मध्ये २२ नवीन औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये व विद्यमान पदविका संस्थांमध्ये २० पदवी औषधनिर्माणशास्त्र अभ्यासक्रम महाविद्यालये सुरु करण्यात आली आहेत.
(२) शैक्षणिक वर्ष २०१८-१९ ची या अभ्यासक्रमाची प्रवेश प्रक्रिया सुरु असून सदर अभ्यासक्रमाच्या प्रवेशाचा अंतिम दिनांक ३१.८.२०१८ असल्याने त्यानंतर रिक्त जागांची संख्या स्पष्ट होणार आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कोकणातील रत्नागिरी, रायगड व सिंधुदुर्ग जिल्ह्यात गेल्या अनेक वर्षापासून गिधाड संवर्धन प्रकल्प बंद झाल्याबाबत

**(४०) ४१४१२ (०१-०८-२०१८). श्री.प्रसाद लाड :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात नामशेष होणाऱ्या पक्षांच्या यादीत समावेश असलेल्या गिधाड पक्षासाठी कोकणातील रत्नागिरी, रायगड व सिंधुदुर्ग जिल्ह्यात गेल्या अनेक वर्षापासून गिधाड संवर्धन प्रकल्पांतर्गत वन विभागाने सुरू केलेली उपहारगृहे अर्थात व्हल्चर रेस्टॉरंट बंद पडली आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने उपहारगृहे व गिंधाड संवर्धनासाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२२-०९-२०१८) :** (१) व (२) चिपळून वन विभागामध्ये दापोली वन परिक्षेत्रात गिधाड संरक्षण व संवर्धन कार्यक्रम राबविण्याकरीता मौजे सुकोंडी ता.दापोली, मौजे कळकवने ता.मंडणगड व मौजे विहाळी ता.खेड या गावांची निवड करण्यात आलेली आहे.

मौजे सुकोंडी ता.दापोली येथील परिसरात वनविभागाची जागा नसल्याने भाडे तत्वावर जागा घेऊन गिधांडांकरीता खाद्य केंद्र चालविण्यात येत आहे. जागा मालकाने जागा भाड्याने देण्यास एप्रिल, २०१७ पासून नकार दर्शविला होता. तथापि, गिधाड खाद्य केंद्राकरीता योग्य ठिकाण मिळत नसल्याने जमीन मालक श्री.मंदार रमेश शिंदे यांनी प्रति वर्ष भाडे वाढ करुन जागा भाडे तत्वावर देणेस संमती दर्शविली आहे. त्यानुषंगाने गिधांडांकरीता खाद्य केंद्र सुरू करण्याची कार्यवाही सुरू आहे.

मौजे विहाळी ता.खेड या परिसरात खाजगी जागा भाडे तत्वावर घेऊन गिधाड संवर्धन कार्यक्रम राबविला जात होता. तथापि सन २०१६ पासून मौजे विहाळी ता.खेड या परिसरात गिधाडांचा वावर आढळून न आल्याने सदरचे गिधाड खाद्य केंद्र बंद आहे.

मौजे कळकवने ता.मंडणगड येथे भाडे तत्वावर जागा घेऊन गिधाड खाद्य केंद्र सुरु आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## शासकीय कामामध्ये मराठी भाषेचा वापर करण्याबाबत

**(४१) ४१८४७ (०१-०८-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मराठी भाषा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासकीय कामामध्ये दिनांक १ मे, १९६६ पासून मराठी भाषा वापरणे अनिवार्य करण्यात आले असून त्याची अंमलबजावणी करण्यासाठी अनेक वेळा शासन आदेश काढूनही त्याकडे दुर्लक्ष होत असल्याने मराठी भाषा विभागाने पुन्हा एकदा मराठी अनिवार्य करण्याचे परिपत्रक दिनांक ८ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास काढल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त परिपत्रकांची आवश्यक ती कार्यवाही होते की नाही याबाबत शासन लक्ष देणार आहे काय,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१८-०९-२०१८) :** (१) होय. सदर शासन परिपत्रक हे दिनांक ७ मे, २०१८ रोजी निर्गमित करण्यात आले आहे.

(२) दिनांक ७ मे, २०१८ च्या शासन परिपत्रकामध्ये शासकीय कार्यालयांमध्ये मराठी भाषेचा वापर होतो का नाही हे पाहण्यासाठी प्रत्येक कार्यालयामध्ये “मराठी भाषा दक्षता अधिकारी” नेमण्यासाठी सूचना दिलेल्या आहेत. शासन व्यवहारातील मराठीच्या वापराबाबत राज्य शासनांतर्गत कार्यालयीन तपासणी करण्याचे काम भाषा संचालनालयाकडून करण्यात येते.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात अतिमहत्वाच्या व्यक्तींच्या विमान प्रवासावर होणारा खर्चाबाबत

**(४२) ४१९८९ (०२-०८-२०१८). श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्याचे महामहिम राज्यपाल, मा.मुख्यमंत्री व मा.अर्थमंत्री यांचा दिनांक १ एप्रिल, २०१५ ते १७ फेब्रुवारी, २०१८ या कालावधीत खाजगी विमानखर्च ३५.५२ कोटी रुपये तर सरकारी मालकीच्या वापराविना असलेल्या विमानाच्या डागडुजीवर रुपये ९.०९ कोटी खर्च झाल्याचे विमान वाहतूक संचालनालयाकडून माहितीच्या अधिकारात माहे मार्च, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान मिळालेल्या माहितीवरून निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शासनावर प्रचंड थकित कर्ज असूनही शासकीय यंत्रणेकडून शासनाच्या पैशाची उधळपट्टी सुरु आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, विमान प्रवासाच्या सदर शासकीय खर्चावर नियंत्रण आणण्यासाठी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०९-२०१८) :** (१) होय, हे अंशत: खरे आहे.

महामहिम राज्यपाल, मा.मुख्यमंत्री व मा.अर्थमंत्री यांच्या शासकीय दौऱ्याकरीता दिनांक १ एप्रिल, २०१५ व १७ फेब्रुवारी, २०१८ या कालावधीत भाडे तत्त्वावर घेण्यात आलेल्या हवाई वाहन खर्चापोटी रुपये ३५.५२ कोटी खर्च झाला आहे.

राज्य शासनाच्या मालकीच्या बीचक्राफ्ट सुपरकिंग एअर बी-३५० व्हीटी-एमजीजे या विमानाच्या देखभालीवर दिनांक १ एप्रिल, २०१५ ते १७ फेब्रुवारी, २०१८ या कालावधीत केंद्र शासनाच्या डी.जी.सी.ए.च्या नियमानुसार रुपये १.४५ कोटी इतका खर्च झाला आहे. मार्च, २०१८ मध्ये माहितीच्या अधिकाराखाली देण्यात आलेल्या उत्तरामध्ये रुपये ९.०९ कोटीच्या या खर्चामध्ये शासनाच्या मालकीच्या ४ हवाई वाहनांच्या देखभालीवरील खर्चाचा समावेश आहे.

(२) हे खरे नाही.

महामहिम राज्यपाल, मा.मुख्यमंत्री व मा.अर्थमंत्री यांच्यासाठी करण्यात आलेला हवाई प्रवासावरील खर्च हा शासकीय कामकाजासाठी सार्वजनिक हित लक्षात घेऊन करण्यात आलेला आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ”एक अधिकारी, एक घर, एक राज्य” या नियमानुसार सरकारी योजनेतून निवासस्थान देण्यासाठी नियमात बदल करण्याबाबत

**(४३) ४२५२४ (०२-०८-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) “एक अधिकारी, एक घर, एक राज्य” या नियमानुसार सरकारी योजनेतून निवासस्थान देण्यासाठी नियमात बदल करण्यास राज्य शासन तयार असल्याची माहिती महाधिवक्ता मा.अशुतोष कुंभकोणी यांनी मा.उच्च न्यायालयात दिली असल्याचे माहे मे, २०१८ च्या पहिल्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात सनदी अधिकारी व न्यायाधिशांना सरकारी योजनेतून एक घर देण्यासाठी धोरण बनविण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त धोरण बनविण्याबाबत शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे, तसेच ज्या सनदी अधिकारी व न्यायाधिशांनी शासकीय घरे असतांनाही शासकीय कोट्यातून एकापेक्षा जास्त घरे घेतली आहेत त्यांची चौकशी करुन शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (११-०९-२०१८) :** (१), (२) व (३) अंशत: खरे आहे.

मा.उच्च न्यायालयात श्री.केतन निरोडकर यांनी दाखल केलेल्या The Criminal PIL (stamp) २४/२०१७ या याचिकेच्या सुनावणी दरम्यान एक अधिकारी, एक घर, एक राज्य याबाबत मुद्दा उपस्थित झालेला असल्याचे मा.महाधिवक्ता यांनी दिनांक २१/०६/२०१८ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे. या अनुषंगाने मा.महाधिवक्ता यांच्याकडून युक्तीवाद करण्यात आलेला आहे. सदर प्रकरण अंतिम निर्णयार्थ न्यायप्रविष्ट असल्याचे देखील त्यांनी कळविले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## झुडपी जंगलांची जमीन स्थानिक स्वराज्य संस्थांना हस्तांतरित करण्याबाबत

**(४४) ४२९२४ (०१-०८-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील झुडपी जंगलांची जमीन स्थानिक स्वराज्य संस्थांना हस्तांतरित करण्यासंदर्भातील प्रस्ताव राज्य शासनाने केंद्र शासनाला पाठविला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, केंद्र शासनाकडून अद्याप मंजुरी न मिळाल्यामुळे या जमिनींवरील शाळा इमारती, अंतर्गत रस्ते व अन्य बांधकामे स्थानिक स्वराज्य संस्थांकडे हस्तांतरित करण्यात अडथळा निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर प्रस्तावाला मंजुरी मिळण्याबाबत शासनाने कोणते प्रयत्न केले आहेत व किती कालावधीत मंजुरी प्राप्त होण्याची शक्यता आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१५-०९-२०१८) :** (१), (२) व (३) राज्यातील नागपूर, वर्धा, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या सहा जिल्ह्यांमध्ये झुडपी

जंगल क्षेत्राची व्याप्ती आहे. झुडपी जंगल क्षेत्र स्थानिक स्वराज्य संस्थांना हस्तांतरीत करण्याबाबत सद्य:स्थितीत शासनाचे धोरण नाही. शासकीय अभिलेखात ‘जंगल’ म्हणून नोंद असल्याने कोणत्याही वनेतर प्रयोजनासाठी झुडपी जंगल क्षेत्राचा वापर प्रस्तावित असेल तर वन (संवर्धन) अधिनियम, १९८० अंतर्गत केंद्रीय पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालयाची पूर्वपरवानगी आवश्यक ठरते. केंद्र शासनाने व्यवस्थापनासाठी अयोग्य असे ३ हेक्टर पेक्षा कमी असलेले तुकड्या-तुकड्यातील, अतिक्रमणाखालील व वनेत्तर वापराखालील एकूण ८६,४०९.३२ हे. क्षेत्र वळतेकरणाचे प्रस्ताव सादर करण्यासाठी सुलभ कार्यपद्धती (Simplified Procedure) निश्चित केली असून त्यास अनुसरुन प्रस्ताव केंद्र शासनास सादर करण्यात येत आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीच्यावतीने (एमएडीसी) शिर्डी, धुळे, अमरावती व कराड येथील विमानतळावर हवाई उड्डाण प्रशिक्षण संस्था सुरु करण्याबाबत

**(४५) ४३०५८ (०२-०८-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीच्यावतीने (एमएडीसी) शिर्डी, धुळे, अमरावती व कराड येथील विमानतळावर हवाई उड्डाण प्रशिक्षण संस्था सुरु करण्याच्या प्रस्तावाला शासनाने तत्वत: मान्यता दिली असल्याचे माहे एप्रिल, २०१८ च्या तिसऱ्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०९-२०१८) :** (१) नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वर्धा जिल्ह्यातील कोषागार कर्मचाऱ्यांच्या विविध प्रलंबित मागण्याबाबत

**(४६) ४३०८५ (०१-०८-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वर्धा जिल्ह्यातील कोषागार कर्मचाऱ्यांच्या विविध प्रलंबित मागण्यासंदर्भात वारंवार पाठपुरावा करुनही शासनाने कर्मचाऱ्यांच्या न्याय मागण्याबाबत कोणताही निर्णय घेतला नसल्यामुळे कोषागार कर्मचारी संघटनेद्‌वारा दिनांक ३ व ४ मे, २०१८ रोजी राज्यभर सामुहिक रजा आंदोलन केले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (११-०९-२०१८) :** (१) होय.
(२) कर्मचाऱ्यांच्या मागण्यांबाबत उचित कार्यवाही करण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वीज पारेषण कंपनीची अति उच्चदाबाची वीज वाहिनी अल्पभूधारक शेतकऱ्यांच्या शेतातून बळजबरीने नेल्याबाबत

**(४७) ४३१३५ (०१-०८-२०१८). श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.हेमंत टकले, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) किन्हवली (जि.ठाणे) येथील एका स्टोन क्रशरला वाचविण्यासाठी वीज पारेषण कंपनीची अति उच्चदाबाची वीजवाहिनी अल्पभूधारक शेतकरी अनंत सोनार यांच्या शेतातून बळजबरीने नेली जात असून शेतकऱ्यांचे मोठे नुकसान होत असल्यामुळे त्यांनी मा.मुख्यमंत्री यांच्याकडे निवेदन सादर केले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याप्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीचे निष्कर्ष काय आहेत व त्यानुषंगाने शेतकऱ्यांना न्याय देण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०१-०९-२०१८) :** (१) होय.

(२) महापारेषण कंपनीतर्फे ४०० के.व्ही. कुडूस उपकेंद्रासाठी बाभळेश्वर (जि.अहमदनगर) ते कुडूस (जि.पालघर) ४०० के.व्ही. अशी २३० कि.मी. व्दिपथ वाहिनी उभारण्यात येत आहे. महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनीकडून प्राप्त माहितीनुसार सदर वाहिनीचे काम सन २०११ पासून सर्व नियमांचे पालन करुन, मंजूर प्रोफाईल व मंजूर मार्ग नकाशानुसार सुरु आहे. तसेच सदर वाहिनीचा कोणताही मनोरा श्री.अनंत हरीभाऊ सोनार यांच्या प्रत्यक्ष शेतात उभारण्यात आलेला नसून मनोरा क्र. ६९ ते ७० यांना जोडणाऱ्या वाहिनीची तार त्यांच्या शेतातून जाणार आहे.

श्री.अनंत हरीभाऊ सोनार यांची तक्रार निराधार असून वाहिनीची उभारणी पूर्वीच मंजूर असलेल्या मार्गनकाशानुसार करण्यात येत आहे. तसेच तांत्रिकदृष्टयाही सदर वाहिनी स्थलांतरित करणे शक्य नाही.

वाहिनीची तार ओढल्यानंतर तारेखालील जमिनीचा मोबदला नियमानुसार संबंधितांस देण्यात येईल.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यभरातील महाविद्यालयात प्राचार्य या मुख्य पदासह शिक्षक आणि शिक्षकेत र कर्मचाऱ्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(४८) ४३३१६ (०१-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील महाविद्यालयात प्राचार्य या मुख्य पदासह सुमारे १८ हजाराहून अधिक शिक्षक आणि शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या जागा रिक्त असल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खेर आहे काय,

(२) असल्यास, महाविद्यालयाचे वेतनेतर अनुदान वाढवा, परीक्षा काळात महाविद्यालयांना पोलीस संरक्षण द्या, प्राचार्याचा कार्यकाळ वाढवा अशा विविध मागण्या महाराष्ट्र राज्य प्राचार्य महासंघाचे उच्च शिक्षण संचालक यांच्याकडे केल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, त्याचे सर्वसाधारण स्वरुप काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१४-०९-२०१८) :** (१) नाही.

ऑक्टोबर, २०१७ अखेरच्या विद्यार्थीसंख्येच्या आधारे राज्यातील अशासकिय अनुदानित संस्थेतील ९५११ शिक्षकीय व ८७९८ शिक्षकेतर पदे रिक्त असल्याचे निदर्शनास आले आहे.

(२) हे अंशत: खरे आहे.

(३) या प्रकरणी प्राचार्य महासंघासमवेत संचालक, उच्च शिक्षण संचालनालय यांच्याकडे झालेल्या बैठकीत ठरल्याप्रमाणे आवश्यक ते प्रस्ताव प्राचार्य महासंघाने उच्च शिक्षण संचालनालयास दिल्यानंतर त्यावर उचित कार्यवाही करण्याचे ठरले.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## प्रादेशिक विकासाचा असमतोल दूर करण्याबाबत

**(४९) ४३४७८ (०१-०८-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **नियोजन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) प्रादेशिक विकासाचा असमतोल दूर करण्यासाठी शासनाकडून विदर्भ, मराठवाडा व उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास महामंडळ स्थापन करण्यात आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास सदर महामंडळामार्फत कोकणाचा अनुशेष भरून काढण्यासाठी शासनाकडून किती निधी उपलब्ध करून देण्यात आला, तसेच कोकणाचा अनुशेष भरून काढण्यासाठी स्वतंत्र वैधानिक विकास महामंडळ स्थापन करण्यात यावे अशी मागणी गेली अनेक वर्षे होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१२-०९-२०१८) :** (१) भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३७१ (२) अन्वये अनुशेष निर्मुलनासाठी विदर्भ, मराठवाडा व उर्वरित महाराष्ट्र यांच्यासाठी स्वतंत्र विकास मंडळाची स्थापना दिनांक ३० एप्रिल, १९९४ पासून करण्यात आली.

(२) व (३) कोकण प्रदेशाचा समावेश उर्वरित महाराष्ट्र विकास मंडळात होतो. विकास मंडळाच्या कार्यक्षेत्रामध्ये अनुशेष निर्मूलनासाठी विदर्भ, मराठवाडा व उर्वरित महाराष्ट्र विकास मंडळाच्या शिफारशीनुसार विकास कामे हाती घेण्यासाठी सन १९९५-९६ ते २०१०-२०११ या कालावधीत प्रतिवर्षी तीनही विकास मंडळांना एकत्रित रुपये १०० कोटी इतक्या विशेष निधीची तरतूद करण्यात आली. तद्नंतर फक्त सन २०१४-१५ या एका वर्षाकरीता तीनही विकास मंडळांना प्रत्येकी रुपये १०० कोटी इतका विशेष निधी उपलब्ध करण्यात आला होता.

कोकण प्रदेशाकरीता स्वतंत्र विकास मंडळ स्थापन करण्याबाबत भारतीय संविधानाच्या अनुच्छेद ३७१ (२) मध्ये दुरूस्ती करण्याबाबत राज्य शासनाद्वारे दिनांक १५ जुलै, २०१३, दिनांक २ जुलै, २०१४,

दिनांक १२ मार्च, २०१५ व दिनांक १७ सप्टेंबर, २०१६ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयास विनंती करण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## अमळनेर तालुक्यातील वृक्षतोड रोखण्याबाबत

**(५०) ४३८४८ (०१-०८-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **वने मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अमळनेर तालुक्यातील वन क्षेत्रात तसेच रस्त्यालगत डेरेदार वृक्ष जाळण्याचे तसेच वृक्षतोड होत असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, वनपरीक्षेत्र अधिकारी यांच्याकडे तक्रार करुनही कोणत्याही प्रकारची कारवाई केली जात नसल्याचेही निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दोषी व्यक्ती व अधिकारी यांच्यांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (१५-०९-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**डॉ. अनंत कळसे**
**प्रधान सचिव,**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.